# —पसायदान—



आत्मसौंदर्यानें आणि त्याचेंच प्रतिबिंब असलेल्या विश्वसौंदर्यानें ज्याचें मानस मोहरलें आहें, अशा एका महामानवाचे, महान युवा व्यक्तित्त्वाचे हे धन्योद्गार आहेत.

मात्र, अनेकांनी या पसायदानाचा इतका कीस काढला आहे कीं, त्यांतील सगळे सौंदर्य, उत्तम उदात्त महन् मधुर, जें जें कांहीं त्यांत आहे, तें नष्ट होण्याच्या मार्गावर आहे असें वाटतें.

एकाद्या लावण्यवतीचें लावण्य फूटपट्टीनें मोजावे तसा हा प्रकार झाला आहे. तिच्या नासिकेची लांबी रून्दी किती, तिच्या भ्रूभंगाची वक्राकारता किती, सुमधुर हास्य केल्यावर तिच्या कपोलाला पडणारी खळी किती अथवा तिची नाजुक जिवणी किती भरेल, तिचें मापन करण्याची उर्मी! अगदी असाच वेडेपणा पसायदानासंबंधी अनेकांनी केला आहे.

नगरजनांच्या सहवासानें एका वनकन्येला सुसंस्कारित करावे अशा उत्कट आकांक्षेनें प्रेरित होऊन एका कवयित्रीने त्या वनकन्येचें जीवन कांहीं दिवस अगदी जवळून न्याहाळलें. त्यानंतर तिनें त्यावर कसे भाष्य केलें आहे, पहा—

नागरनीति शिकवाया तुज, आले तुझियाकडे ।
सौंदर्याच्या शांत जलाशयीं टाकावे कां खडे ।।

आम्हांस ही वस्तु कधी कळेल का?

व्यावहारिक जीवनांतहि ही कवयित्री किती प्रौढ बुद्धिमत्तेची आहे. याउलट आम्हीं पसायदानासारख्या उदात्त वस्तुविषयीं किती पोरकट आहोत, किती अरसिक आहोत हे ध्यानीं आल्यावर स्वत:ची लाज वाटते.

पसायदानाविषयीं अनेकांनी नुसते खडेच टाकले नाहीत तर चांगली धोंडमार केली आहे.

पसायदान अगदी सरळ साधे आहे. त्यावर भाष्य करण्याची जरूरी काय? तें काय सूत्र वाङ्मय आहे? शिवाय जेथे श्रुत्यर्थ सरळ लागूं होतो, तेथे लक्षणा करूं नये असा शास्त्रसंकेत पूर्वापार चालत आला आहे; तेव्हां अशा स्थितींत हे शब्दबंबाळ कशासाठीं?

केव्हढेहि श्रेष्ठ पसायदान असले तरी विश्वांत कांहीं फरक पडतो का? ज्ञानदेवांच्या पसायदानानंतर महाराष्ट्राची स्थिती अंतर्बाह्य कारणामुळें इतकी वाईट आणि भयानक झाली कीं, मला वाटते, महाराष्ट्रानें या पसायदानाचा जणूं सूड उगविला.

कल्याण करीं रामराया। जनहित विवरी।।
हें समर्थांचें पसायदान नाहीं काय? समर्थ पुढे म्हणतात, अपराधी जन चुकतचि गेले। तुझा तूंचि सावरी। खळांची व्यंकटी सांडो। याचे तुलनेंत हें काकणभरहि कमी भरत नाही. दास म्हणे आम्ही केले पावलो। दयेसी नाहीं सरी।। तेथ म्हणे श्री विश्वेश्वराहो। हा होईल दानपसावो।।

सामुहिक पसायदान, सामुहिक ‘वन्दे मातरम्’ प्रमाणें निष्प्राण होते. तरी बरे, ज्ञानदेवांनी हें पसायदान शुद्ध मराठींत लिहिले.‘वन्दे मातरम्’ बहुतेक संस्कृतमय आहे. त्यामुळें त्याचा पूर्ण चोथा झाला आहे. ज्याला संस्कृतची  बऱ्यापैकी जाण आहे आणि त्याचें उच्चारण ज्याला चांगले अवगत आहे त्या एकानेच म्हणावे आणि समुदायानें ऐकावे.काय असेल तें असो,कुठलीहि वस्तूं सामुहिक केली कीं, त्यांतील प्राण निघून जातो आणि उरतें तें केवळ कलेवर.

ज्ञानेश्वरी तालासुरांत म्हणूं नये. गायन तर अगदी वर्ज आहे. लता मंगेशकरच्या ज्ञानेश्वरींतील प्रथमच्या ओव्या अथवा पसायदान, अगदी वेडेपणा आहे तो! {तांबे लिरिकल पोएट आहेत. त्यामुळें त्यांचें काव्य रागदारींत सादर करणे अधिक उचित आहे.} ज्ञानेश्वरींतील काव्याला सुरावट लावणें बेढंगी प्रकार वाटतो. हां, त्याला लय-ताल अत्यावश्यक आहे. कारण शेवटीं तें काव्य आहे. मात्र वरील प्रकारामुळें ज्ञानेश्वरींतील काव्य, साहित्य, लालित्य याची पार वाट लागली आहे. ज्ञानेश्वरी अपात्र लोकांच्या हातांत गेली

आहे. अनामिका सार्थवती होते की काय अशी भीती वाटावी इतक्या अत्यल्प सुजाण व्यक्ति वारकरी संप्रदायांत शिल्लक राहिल्या आहेत.मात्र स्थिती अशी आहे कीं, त्यांना कुणी कुत्रं विचारत नाहीं. सगळा बाकीच्यांचाच धांगडधिंगा चालूं आहे.

लहानपणीं आणि किशोर वयांतहि मी हें अनुभविले कीं, वारकरी संप्रदायांत सर्वांनी मिळून पसायदान म्हणण्याची पद्धति आहे. त्यांत नकळत एक औपचारिकता येत असल्यामुळें मला त्याचें कधीहि आकर्षण वाटलें नाहीं. त्यांत कांहीं विशेष आहे हेंहि जाणवले नाही.

नंतर असे झालें कीं, गीतेचा अभ्यास करतांना मधून मधून ज्ञानेश्वरी पहावी लागे.असाच एकदां १८व्या अध्यायांतील संदर्भ पहात असतां अगदी शेवटच्या भागांत आलो आणि एक ओवी मला फार आवडली. किंबहुना तुमचे केले। धर्मकीर्तन हें सिद्धी गेले। तेथ माझे जी उरले। पाईकपण।। आणि लगेच पुढच्या ओव्या— आतां विश्वात्मकें देवें। येणें वाग्यज्ञें तोषावे।

ध्यानीं आले कीं, आपण जें पसायदान ऐकत होतो तें हें आहे? हेच आहे तें? फार नवल वाटलं! असा आश्चर्य चकित झालो! नंतर पुढील ओव्या वाचल्या. ज्ञानदेवांनी आपल्या या काव्यसंभाराला 'वाग्यज्ञ' म्हटलं. मला या शब्दानें चित्ताच्या कोणत्या अवस्थेंत नेले ते कांहींच सांगता येणार नाहीं.''लोकोत्तराणां चेतांसि कोऽहि विज्ञातुं अर्हति'' हेच खरे. ज्ञानदेवांचा या वाग्यज्ञाचा समारोप केवढा अद्भुतरम्य आहे! उदात्तता तर त्यांतील स्थायीभाव आहे. आणि माधुर्य, ''रम्याणि वीक्ष मधुरांश्च निशम्य शब्दान्'' ही कालिदासाची काव्यपंक्ति आठवते.

ज्ञानेश्वरीचें वाचन कसे करावे? यासाठीं विस्तारानें लिहावे लागेल. महाराष्ट्रापुरते बोलायचे झाल्यास येथें जे अनेक पंथ अथवा संप्रदाय आहेत हे आजघडीला तरी तत्त्वनिष्ठ फार कमी प्रमाणांत आहेत. ते एका चौकटींत, एका मोल्डमध्यें स्वत:ला घालून घेतात.त्यामुळें त्यांचा एक कंपू, एक गोट तयार होतो. यांत अति व्यवहार आणि सक्त नियम केल्यामुळें त्या संप्रदायाचा एक अड्डा तयार होतो. काव्य, साहित्य,

धर्म, तत्त्वज्ञान झाडून सगळ्या क्षेत्रांत हे अड्डे तयार झाले आहेत. जन्माला येऊन जर असेच वागायचे असेल तर सरळ संसार प्रपंच केलेला काय वाईट? ‘‘बरे सत्य बोला यथातथ्य चाला’’ या तत्त्वानुसार उत्तम प्रपंच करावा. काव्य साहित्याची अथवा देवाचीहि कांहीं जरूरी नाही. एक विरंगुळा, एक समाधान म्हणून आम्ही देवाची आवश्यकता निर्माण करून घेतली आहे, असे कशावरून नसेल? ‘‘तुका झाला सांडा। विटंबिती पोरे रांडा’’ कोपला पाटील गांवचे हे लोक। आतां मज भीक कोण घाली।। आतां येणे चवी सांडिली म्हणती। अशी आमच्या जीवनाची परवड आहे काय? नाहीं ना? मग आम्ही त्याच्यापेक्षां श्रेष्ठ आहोत, असे म्हणता येते काय? खरी स्थिती अशी आहे कीं, आम्ही एका मजबूत गोटांत सुरक्षित उभे आहोत.आमचे सगळे छान चालले आहे. लोक आमच्याकडे चांगल्या दृष्टीने बघतात. तुकाराम बिचारा उघड्या आभाळाखालीं उभा होता. धन्य आहे त्याच्या साहसाची, धैर्याची, चिकाटीची, परिश्रमाची! ‘‘हेचि शूरत्वाचें अंग। हारीं आणिला श्रीरंग।। आम्हीं तुकारामाकडे एक माणूस म्हणून पहातच नाहीं. ‘जगद्‌गुरू तुकाराम महाराज’

म्हणून आम्ही त्याला दूर लोटले आहे. त्याला जवळ करा. पहा, तुम्हीं कुठल्याहि संप्रदायांत टिकणार नाही. उघड्या आभाळाखालीं येऊन उभे रहाल. मग पहा कशी परवड होते ती! त्याच वेळीं हेहि ध्यानीं येईल कीं, लोकांनी तिला परवड म्हणायचे मात्र तुम्हास ती फार लाभदायी वाटेल.‘‘जगें अवज्ञाची करावी। संबंधी सोयची न धरावी। ऐसी ऐसी जीवीं चाड बहु।। अथवा न मिळो खावया। न वाढो संतान। परी हा नारायण। कृपा करो।। अशी नारायणाची किंमत मोजावी लागते तरी त्याची तमा मुळीच वाटणार नाही. कारण नव्हें सार, संसार हा घोर आहें। मना सर्वथा सत्य शोधूनि पाहे। जनीं वीष खाता पुढे सूख कैसे। करी रे मना, ध्यान या राघवाचे।। मात्र आम्ही आज ज्या स्थितींत आहोत त्या स्थितीत हे आम्हांस कधीच कळणे शक्य नाही. या कळण्याच्या स्थितींत आम्ही कधीच नव्हतो, आत्ताहि नाही. कारण आमचे उत्तम चालले आहे. आम्ही मजेंत आहोत.

२०वर्षे झाली असतील, मी असाच एकदां आळंदींत गेलो असतां महाद्वारापासून वर रस्ता जातो

त्या नगर प्रदक्षिणेच्या वाटेवर मला एक बाई भेटली. ‘‘चला महाराज, सिद्धबेटांत ज्ञानेश्वरी पारायण आहे.’’ मी तेथे गेलो त्यावेळीं ११ वाजलें होते. १ वाजतां पारायण संपलें. सकाळपासून एका चहावर होतो. मला भयंकर भूक लागली. कुठं सिद्ध बेट कुठं आळंदी! मला पाय उचलत नव्हता. ती बाई सरळ चालत होती. ती भटकी बाई, तिला भुकेची सवय होती. मी मात्र पाय घासीत फरपटत चाललो होतो. मधला ओढा आला. आणि मन  झट्कन ७०० वर्षे मागे गेले. तेथेच ओढ्याच्या कठड्यावर बसलो. मला हुमसून हुमसून रडूं फुटलं. भूक कुठल्या कुठं पळाली. आळंदींत ब्राह्मणांच्या घरीं माध्यांनी स्वयंपाक होत असे. नंतर मधुकरी मिळे. ही गोजिरवाणी मुलं, घरांत खायला कांहीं नसे. पाणी पिऊन बसून रहात असत. सूर्य माध्यांनी आल्यावर ही मुलं खांद्यावर झोळया अडकवून अनवाणी वाट चालत आळंदी गांवात यायची. निवृत्ति दहा वर्षाचा, ज्ञानदेव आठ आणि सोपाना सहा. ही बाळं जनांची अवहेला सहन करीत ही मधुकरी कधी घरीं नेत असतील, कधी खात असतील आणि हें भिक्षान्न मातापित्यासह सर्वांना किती पुरत असेल.

एकवेळचें भिक्षान्न दोन वेळेला म्हणजे हें काय जेवण आहे? प्राणधारणेसाठीं औषध म्हणून ते त्या अन्नाचं सेवन करीत असतील. कसला खडतर हा जीवन प्रवास! ज्ञानदेवा,आमच्या पूर्वजांच्या कदान्नावर तूं जगलास, वाढलास आणि त्याची परतफेड म्हणून नऊ हजार ओव्यांचं हें पंचपक्वानांचं ताट आमच्यापुढे ठेवलस. तूं कसा आहेस, काय आहेस, तुला कुठल्या शब्दांत काय म्हणावे. कांहीं कळतच नाही. हें जें तुझें अपार ऋण आहे, त्यासंबंधी बोलण्यास माझी शब्दसृष्टी पांगळी झाली आहे. आणि ऋणांतून उतराई, हा शब्द सुद्धा नको. मी असहाय्य झालो आहे रे! असे चित्तांत अपार दाटून मला रडूं फुटलं. ती बाई म्हणाली, ‘महाराज का व रडतां?’ तिला सगळं सांगितल्यावर म्हणाली,‘त्यांच्यासाठीं आपण कशाला रडायचं. ती देवमानसं होती.’मी तट्कन उठून उभा राहिलो. मला त्या बाईचं बोलणं मुळीच आवडलं नाही. ती अशिक्षित बाई. तिच्याविषयीं मनांत अढी धरणं व्यर्थ होतं. तिला म्हटलं, ‘चला.’ आळंदींत आलो. पोटांत भूक तर भयंकर होती पण तिचा आतां त्रास नव्हता. भुकेनें आतडी पिळवटत होती पण ती दुसऱ्या कुणाची, माझी

नव्हती आणि तें दु:ख मी तीव्रतेने अनुभवित होतो. ज्ञानदेवाच्या परिस-स्पर्शाने माझें सोनें झाले होतें. विश्वाचे आर्त माझें मनीं प्रकाशले. प्रदक्षिणेच्या वाटेवर आल्यावर ती बाई म्हणाली, तुमी  जेवा आतां. लई भुका लागल्या असतीन'' ''तुमच्या जेवणाचं काय?'' त्यावर ती म्हणाली, ''माज्यापाशी सताठ रूपय हायेती. एक माय वळखीची हाय. ती चार रूपयांत पाच चपात्या दिती. हाटिलातून दोन रूपयाचं कोरड्यास आणीन. म्हंजे भागली दोपारची येळ.'' मी म्हणालो, ''तुमच्या जवळचे पैसे उद्यासाठीं ठेवा. आतां चला माझ्याबरोबर. आपण जेऊं.'' 'असं म्हंता?' असं म्हणून ती आली. एक चांगली खाणावळ पाहिली आणि दोन राईसप्लेट सांगितल्या. चटणी, कोशिंबीर, दह्याची वाटी, पापड सगळं व्यवस्थित. ती फार तन्मय होऊन जेवत होती. ताटांत बोटाने दाखवून म्हणाली ''हे लई झ्याक झालंय.'' मी सांगितल्यावर पोराने चारपांच चमचे कोशिंबीर वाढली. ती जेवणांत तल्लीन झाली होती. वसवस मात्र नव्हती. निपटीशिपटी जेवली.माझ्या पुढचे ताट तसेच होते. जेवायला सुरवातहि केली नव्हती. मी तिच्याकडेच पहात होतो. तिच्यामुळेंच आज

‘‘सोनियाचा दिन आजी अमृतें पाहिला’’ असें झालें होतें. मी जेवायला सुरवात केली. एवढ्या भुकेच्या पोटीहि अन्न हा भोग राहिला नाही. उपनिषद म्हणते, अन्नं ब्रह्मेति व्यजानत्। अगदी खरे आहे तें. नाथ म्हणतात, विषयाचे जे गोडपण। रसनेचे जे जाणपण। दोहीसी ऐक्य केल्या जाण। रसना संपूर्ण जिंकिली।। ही स्थिती मला अनायासे प्राप्त झाली.‘अहंता न देहीं कधी बुडूं द्यावी। विवेके स्थापावी आत्म्यामाजीं ।। त्या दिवशीं माझा मी नव्हतोच त्यामुळें या सांडीमांडीच्या साधनांची आवश्यकताच संपली. माझा ‘मी’ भंग पावला म्हणून अभंग ‘असणं’ अनुभवांत आलं.

आळंदी त्यावेळीं दोनतीनशें घरांचं गावढं गांव होतं. एक मोठी डगर उतरून इंद्रायणीचें पाणी गांव आणीत असे. गावांत जुने सिद्धेश्वराचें दगडी देऊळ, कांहीं उघड्या सोपे आणि पडव्या, चावडी व ग्रामसभेसाठीं उपयोगीं पडत. गांवाबाहेर चोहोबाजूस झाडी आणि गर्द रान होतं.त्यांतून चारी दिशेला पाऊल वाटा फुटलेल्या असत. सिद्धबेट तर गर्दरानझाडीचा भाग होता. त्याला ओढ्यानाल्यांतून एकच पाऊल वाट होती. आप्पा ठोंबरे. दिनांक १०/१२/२००८